**राष्ट्रीय अन्न सुरक्षा अधिनियम, २०१३ च्या कलम १५ अन्वये प्रत्येक जिल्ह्यासाठी "जिल्हा तक्रार निवारण अधिकारी" म्हणून अप्पर जिल्हाधिकारी यांना नेमण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,**
शासन निर्णय क्र. असुका २०१३/प्र.क्र ३६१/नापु-२२,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ७ एप्रिल, २०१७

**वाचा:-** १) शासन परिपत्रक महसूल व वन विभाग क्रमांक:-संकीर्ण ०२/२०११/प्र.क्र.१३/ई-१, दि. २९ जूलै, २०११
२) शासन निर्णय अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग समक्रमांक दि. ८ जानेवारी, २०१४.
३) शासन निर्णय अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग समक्रमांक दि. २० फेब्रुवारी, २०१५.

**प्रस्तावना :-**

राष्ट्रीय अन्न सुरक्षा अधिनियम, २०१३ च्या कलम १५ अन्वये अधिनियमातील प्रकरण दोन अन्वये हक्क असलेले अन्नधान्य किंवा आहार यांच्या वितरणासंबंधी बाबींमध्ये व्यथित झालेल्या व्यक्तींची तक्रार शीघ्र व प्रभावी रितीने दूर करण्यासाठी आणि या अधिनियमाच्या हक्कांची अंमलबजावणी करण्यासाठी प्रत्येक जिल्ह्यासाठी एक "जिल्हा तक्रार निवारण अधिकारी" नेमण्याची तरतूद करण्यात आली आहे. अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाच्या कामाचे महत्व व संवेदनशीलता विचारात घेऊन या विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या योजनांची अधिक परिणामकारकरित्या अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने या विभागाचे कामकाज जिल्हाधिकाऱ्यांकडे सुपूर्द करण्याचा निर्णय दि. २९ जुलै, २०११ च्या पत्रकान्वये घेण्यात आला आहे. शासनाच्या सर्व योजनांच्या अंमलबजावणीची जबाबदारी जिल्हाधिकारी यांच्याकडे असल्यामुळे राष्ट्रीय अन्न सुरक्षा अधिनियमांतर्गत अपेक्षित असलेले तक्रार निवारणाचे कामकाज समक्रमांकाच्या दि. ८ जानेवारी, २०१४ च्या शासन निर्णयान्वये सोपविण्यात आले. तसेच संदर्भाधीन दि. २० फेब्रुवारी, २०१५ च्या शासन निर्णयान्वये मुंबई-ठाणे शिधावाटप क्षेत्राकरीता राष्ट्रीय अन्न सुरक्षा अधिनियमांतर्गत अपेक्षित असलेले तक्रार निवारणाचे कामकाज नियंत्रक, शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई यांच्याकडे सोपविण्यात आले आहे. तसेच जिल्हा पुरवठा अधिकारी, ठाणे यांच्या कार्यक्षेत्रापुरतेच कार्यक्षेत्र जिल्हा तक्रार निवारण अधिकारी म्हणुन जिल्हाधिकारी, ठाणे यांच्याकडे सोपविण्यात आले आहे. तथापि, सर्वोच्च न्यायालयातील याचिका (सिव्हील) क्र. ८५७/२०१५, स्वराज अभियान विरुध्द केंद्र शासन याप्रकरणी सर्वोच्च न्यायालयाने ज्यांच्याकडे अन्नसुरक्षा योजना राबविण्याची जबाबदारी आहे, त्यांच्याकडे तक्रार निवारणाचे कामकाज देणे योग्य होणार नाही, अशा सूचना दिल्या आहेत, ही बाब विचारात घेऊन पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे:-

**शासन निर्णय :**

१. राष्ट्रीय अन्न सुरक्षा अधिनियम, २०१३ अंतर्गत राज्यातील जनतेकडून प्राप्त होणाऱ्या तक्रारींचे निराकरण करण्यासाठी सदरहू अधिनियमाच्या कलम १५ अन्वये संबंधित जिल्ह्यांतील अन्नसुरक्षा योजनेशी संबंधित नसलेले अप्पर जिल्हाधिकारी यांची "जिल्हा तक्रार निवारण अधिकारी" (District Grievance Redressal Officer) म्हणून नेमणूक करण्यात येत आहे.

२. मुंबई-ठाणे शिधावाटप क्षेत्रातील प्राप्त तक्रारींचे निराकरण करण्यासाठी सदर शिधावाटप क्षेत्र ज्या महसुली जिल्ह्यामध्ये आहे, त्या मुंबई, मुंबई उपनगर व ठाणे या जिल्ह्यांतील अप्पर जिल्हाधिकारी यांची त्या कार्यक्षेत्राचे "जिल्हा तक्रार निवारण अधिकारी" म्हणून नेमणुक करण्यात येत आहे.

३. अधिनियमाची अंमलबजावणी योग्यरित्या पार पडण्याच्या दृष्टीने अप्पर जिल्हाधिकारी त्यांच्या स्तरावर त्यांच्या अधिनस्त अधिकाऱ्यांचा समावेश करुन एक स्वतंत्र कक्ष निर्माण करुन त्या कक्षाद्वारे अधिनियमामध्ये अभिप्रेत असलेली तक्रार निवारण यंत्रणा उभी करुन तक्रार निवारणाचे कामकाज हाताळतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४०७१५१६०४०४०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Mahesh Dinkar Pathak

Digitally signed by Mahesh Dinkar Pathak
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food,Civil Supplies And Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e9535c95dc1a6714290a6a1e084b3bb4cc266f737f88ea4b79e3f83c4a7ca12d, cn=Mahesh Dinkar Pathak
Date: 2017.04.07 15:20:54 +05'30'

**(महेश पाठक)**
प्रधान सचिव,
अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव,
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३. सर्व मंत्रालयीन विभाग,
४. सर्व विभागीय आयुक्त,
५. सर्व जिल्हाधिकारी,
६. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा,
७. नियंत्रक, शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई.
८. वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई
९. सर्व उप आयुक्त (पुरवठा),
१०. सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी,
११. सर्व अन्नधान्य वितरण अधिकारी,
१२. मा. मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव,

१३. मा. राज्यमंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव,
१४. सर्व अधिकारी (सचिव वगळून), अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,
१५. सर्व कार्यासने, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,
१६. सर्व खाजगी सचिव, मा. मंत्री कार्यालये, मंत्रालय, मुंबई.
१७. सर्व खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री कार्यालये, मंत्रालय, मुंबई.
१८. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
१९. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय, ६वा मजला, विधानभवन, मुंबई
२०. सर्व विधान परिषद सदस्य व विधानसभा सदस्य.
२१. सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक,
२२. निवडनस्ती (कार्यासन नापु-२२)